सिंधूदुर्ग जिल्हयातील रिसोर्स बेस्ड इंटेन्सीव्ह प्लॅनींग अँड डेव्हलपमेंट या पथदर्शी प्रकल्पांतर्गत हस्तकला व्यवसाय उद्योग समुहाच्या विकासासाठी सन २०१६ -१७ मध्ये उपलब्ध करुन दिलेल्या रु. ८ कोटी अनुदानात बदल करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१६/प्र.क्र.१५६/उद्योग-६**
**मंत्रालय, मुंबई-३२**
**दिनांक :- ४ ऑगस्ट, २०१७**

वाचा:- १. शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१६/प्र.क्र.१५६/उद्योग-६ .दि. २१.०९.२०१६.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ यांचे पत्र क्र. मलउविम/चांदा ते बांदा/२०१६-१७/०१८५, दि. १३.०४.२०१७ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त दि. २१.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये सिंधूदुर्ग जिल्हयातील रिसोर्स बेस्ड इंटेन्सीव्ह प्लॅनींग अँड डेव्हलपमेंट या पथदर्शी प्रकल्पांतर्गत हस्तकला व्यवसाय उद्योग समुहाच्या विकासासाठी सन २०१६-१७ करीता महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळकडून राबविण्यात येणाऱ्या ३ योजनांकरीता रु. ८ कोटी इतक्या रकमेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ यांनी त्यांच्या उपरोक्त दि . १३.०४.२०१७ च्या पत्रान्वये सिंधुदुर्ग जिल्हयात काथ्यावर आधारीत उद्योग समुहाच्या केंद्राची संख्या १० वरून १२ करण्यात आली असल्यामुळे काथ्यावर आधारीत उद्योग समुहाच्या विकासासाठी मंजुर केलेल्या रू. ५ कोटी ऐवजी रु. ६.८५ कोटी इतक्या रकमेची आवश्यकता असल्याने बांबु प्रकल्पाद्वारे रोजगार निर्मितीसाठी उपलब्ध करून दिलेल्या रु. २ कोटी अनुदानापैकी रु.१.८५ कोटी अनुदान काथ्यावर आधारीत उद्योग समुहाच्या विकासासाठी उपलब्ध करून देण्याबाबत विनंती केली आहे.त्याअनुषंगाने महामंडळास उपलब्ध करून दिलेल्या रु.८ कोटी इतक्या अनुदानाचे पुढीलप्रमाणे बदल करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | प्रस्तावित खर्च (रू. लाखात |
|---|---|---|
| | **काथ्यावर आधारीत उद्योग समूहाच्या विकासासाठी** | |
| १ | **काथ्यापासून तयार होणाऱ्या उत्पादनाबाबत स्थानिक लोकांमध्ये जन जागृती करणे.**<br>काथ्या उद्योगासाठी आयोजित प्रशिक्षण कार्यक्रमाची जाहीरात/प्रसिध्दी करणे. | २०.०० |
| २ | प्रशिक्षण कार्यक्रमाचे उद्घाटन/इमारतीचे भुमिपुजन व प्रसिध्दीसाठी येणारा खर्च. | १०.०० |
| ३ | काथ्यापासून विविध वस्तु बनविण्याचे प्रशिक्षण आयोजित करणे. | २७.०० |
| ४ | ग्रामीण भागातील महिलांना काथ्यापासून दोरी व पायपुसणी बनविण्यासाठी यंत्रसामुग्री पुरविणे. | ३१.०० |
| ५ | काथ्या, काथ्याची दोरी व इतर उत्पादने तयार करण्यासाठी सामुहिक सुविधा केंद्राची स्थापना करणे. | ५३६.०० |
| ६ | महामंडळामार्फत उभारण्यात आलेल्या महाकॉयर उत्पादन, प्रशिक्षण व प्रदर्शन केंद्र, कुडाळचे सबलीकरण करणे. | ५५.०० |

| | | |
|---|---|---|
| ७ | काथ्या उद्योग सुरू करण्यासाठी कौशल्य वाढवण्याकरीता प्रशिक्षकांना प्रशिक्षण आयोजित करणे. | ६.०० |
| | **एकूण** | **६८५.००** |
| | **बांबू प्रकल्पाद्वारे रोजगार निर्मितीसाठी** | |
| १ | सिंधूदुर्ग जिल्हयातील हस्तकला कारागिरांना हस्तकला वस्तू बनविण्याचे प्रशिक्षण देणे. | १५.०० |
| | **एकूण** | **१५.००** |
| | **हस्तकला समूहाच्या विकासासाठी** | |
| १ | राज्यातील हस्तकलांना प्रोत्साहन देण्यासाठी सावंतवाडी येथे कायमस्वरूपी प्रदर्शन व विक्री केंद्र उभारणे. | ३०.०० |
| २ | सावंतवाडी येथे शिल्पग्राम येथे हस्तकलांचे प्रदर्शन आयोजित करणे. | २५.०० |
| ३ | सिंधुदुर्ग जिल्हयात लोप पावत चाललेल्या हस्तकलांचे जतन करणे | ४५.०० |
| | **एकूण** | **१००.००** |

३. सदर शासन निर्णय हा नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १७२/१४६१,दिनांक २४/७/२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०४१५३३३७४०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namdeo Kondiba Bhosale

Digitally signed by Namdeo Kondiba Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IEL Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, serialNumber=8c6a286229ecc7982a08553f49d547ef64be25c7f26fc96324ece7cccbfeb8c5, cn=Namdeo Kondiba Bhosale
Date: 2017.08.04 15:24:49 +05'30'

**(डॉ.ना.कों.भोसले)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रती,**

१.मा. मंत्री ( वित्त व नियोजन), मंत्रालय, मुंबई-३२.
२.मा. मंत्री ( उद्योग), मंत्रालय, मुंबई-३२.
३.अप्पर मुख्य सचिव, (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, मुंबई.
६.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सिंधूदुर्ग.
७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८.कक्ष अधिकारी (प्रशासन-१) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय.
९.निवडनस्ती, उद्योग-६, मंत्रालय, मुंबई.